मौजे. शिवे, ता.खेड, जि.पुणे येथील प्राथमिक आरोग्य केंद्र त्याच तालुक्यातील मौजे. म्हाळुंगे इंगळे येथे स्थलांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राआकें २०१४/प्र.क्र. २६४/आरोग्य ३अ**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १९ ऑगस्ट, २०१५.

**वाचा :**

१) शासन निर्णय:- सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. संकीर्ण २०१२/प्रक्र-१४१/आ-३ दि.१७.०१.२०१३.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे /जिल्हास्तर /प्रा.आ.केंद्र / उपकेंद्र/स्थलांतर/टे-७/कक्ष-७अ/३१४३-४५/१३, दिनांक ०४.०८.२०१३.

**प्रस्तावना :**

सन २००१ च्या लोकसंख्येवर आधारीत राज्यात आरोग्य संस्था स्थापनेचा बृहत आराखडा शासन निर्णय दिनांक १७.०१.२०१३ अन्वये मंजूर करण्यात आला असून मौजे. शिवे, तालुका-खेड, जिल्हा-पुणे येथे नवीन प्राथमिक आरोग्य केंद्र स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. नविन मंजूर झालेले प्राथमिक आरोग्य केंद्र शिवे व सध्या कार्यरत असलेले प्राथमिक आरोग्य केंद्र आंबोली या दोन्हीतील अंतर व लोकसंख्या कमी आहे. तसेच मौजे.म्हाळुंगे इंगळे, ता.खेड या गावी एमआयडीसी व जास्त लोकसंख्या असल्यामुळे मौ.शिवे ता.खेड, जिल्हा पुणे येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे. म्हाळुंगे इंगळे तालुका-खेड, जिल्हा-पुणे येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मौजे.शिवे, तालुका-खेड, जिल्हा-पुणे येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे म्हाळुंगे इंगळे, तालुका-खेड, जिल्हा-पुणे येथे स्थलांतरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयाअन्वये मान्यता देण्यात येत आहे :-

१) स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यान्वित होऊ शकेल याकरीता संबंधित ग्रामपंचायतीने मोफत जागा देणे अनिवार्य असेल.
२) स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यान्वित होऊ शकेल अशी इमारतीची तात्पुरती व्यवस्था व कर्मचारी निवासाची व्यवस्था असणे आवश्यक राहील. ज्यायोगे या जागेत बाह्यरुग्ण सेवा, स्त्रीरुग्ण तपासणीसाठी स्वतंत्र व्यवस्था, प्रसुतीसाठी व्यवस्था,

कर्मचारी बसण्याची व्यवस्था, रुग्णवाहिका असल्यास पार्कींग होणे अनिवार्य राहील. याबाबत जिल्हा नियोजन व विकास मंडळाने त्यांच्या जिल्हा योजनेतून तरतूद करणे आवश्यक आहे.

३) सदर इमारतीमध्ये पाणी, वीज इत्यादीची व्यवस्था असणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१५०८०७११५४३९७०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubha Anil Gadre

Digitally signed by Shubha Anil Gadre
DN: CN = Shubha Anil Gadre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.08.19 17:40:15 +05'30'

( शु.अ.गद्रे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, पुणे.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ), पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (प्रा.आ.के-जिल्हा स्तर), मुंबई.
७. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, पुणे.
८. महालेखापाल- १/ २ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती,पुणे.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११.जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय,पुणे.
१२.जिल्हा आरोग्य अधिकारी, पुणे.
१३.कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प).
१४.निवडनस्ती (आरोग्य ३)